कालमर्यादा

शासकीय कर्मचाऱ्यांचा सर्वंकष
माहितीकोष तयार करणेबाबत.
Employees Master Database (EMDb)

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**शासन परिपत्रक क्रमांक -असांस-१३२३/ प्र.क्र. ७१/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०२३

**शासन परिपत्रक :**

अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयाकडून महाराष्ट्र शासनाच्या सेवेतील सर्व कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष दरवर्षी अद्ययावत करण्याची कार्यवाही हाती घेण्यात आली आहे. या माहितीकोषामध्ये नियमित आस्थापनेवरील कर्मचारी व नियमितेतर आस्थापनेवरील कर्मचारी (कार्यव्ययी आस्थापनेवरील, रोजंदारीवरील, अंशकालीन, मानसेवी इत्यादी) तसेच तदर्थ तत्त्वावर नेमणुका करण्यात आलेले कर्मचारी अशा सर्व प्रकारच्या कर्मचाऱ्यांची माहिती गोळा करण्यात येणार आहे. त्या आधारे शासकीय कर्मचाऱ्यांच्या सर्व भरलेल्या व रिक्त पदांच्या माहितीचा समावेश असलेला -शासकीय कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष॰ (Employees Master Database-EMDb) अद्ययावत करण्यात येत आहे. त्या अनुषंगाने दिनांक १ जुलै, २०२३ या संदर्भ दिनांकास कर्मचाऱ्यांचा सेवार्थ I.D., भविष्य निर्वाह निधी / DCPS खाते क्रमांक, पॅन क्रमांक, आधार क्रमांक, कर्मचाऱ्याचे संपूर्ण नाव, जन्मदिनांक, लिंग, सेवेत रुजू झाल्याचा दिनांक, निवृत्तीचा दिनांक, सेवेत रुजु झाल्यानंतरचे पदनाम, कर्मचाऱ्याचा भ्रमणध्वनी क्रमांक, कर्मचाऱ्याचा Email I.D., सामाजिक प्रवर्ग, कर्मचाऱ्याची जात, धर्म, स्वग्राम, दिव्यांग व्यक्ती, इत्यादी स्थायी स्वरूपाची माहिती तसेच (लागू असल्यास) सध्याचे पदनाम, सध्याच्या पदावरील पदोन्नतीचा दिनांक, आश्वासित प्रगती योजना, इत्यादी माहिती गोळा करण्यात येणार आहे. तसेच जुलै, २०२३ या संपूर्ण महिन्याच्या वित्तलब्धीची तपशिलवार माहितीही गोळा करण्यात येणार आहे. माहिती नोंदणीकरिता अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडून संगणकीय ऑनलाईन आज्ञावली तसेच लॉग-इन आयडी व पासवर्ड आणि माहिती भरण्याचे व आज्ञावली वापरण्यासंबंधीचे सूचनासंच संबधित कार्यालयांना उपलब्ध करून देण्यात येईल. -शासकीय कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष-२०२३॰ (Employees Master Database § EMDb २०२३) विहित वेळेत अद्ययावत करण्यासाठी व त्याची कार्यवाही योग्य प्रकारे पार पाडण्यासाठी राज्य शासनाचे आहरण व संवितरण अधिकारी, यांनी पुढील वेळापत्रक व सूचना विचारात घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

**वेळापत्रक**

| **तपशिल** | **कालावधी** |
|---|---|
| Login Id व Password संचालनालयाने उपलब्ध करून देणे | दिनांक १७ ऑगस्ट, २०२३ ते<br>दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ |
| आहरण व संवितरण अधिकाऱ्याने माहिती सादर करणे व पहिले प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे | दिनांक ०१ सप्टेंबर, २०२३ ते<br>दिनांक ३० नोव्हेंबर, २०२३ |
| आहरण व संवितरण अधिकाऱ्याने त्रुटींचे निवारण करुन माहिती बरोबर असल्याचे दुसरे प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे | दिनांक ०१ डिसेंबर, २०२३ ते<br>दिनांक २८ फेब्रुवारी, २०२४ |

## २. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांसाठी सूचना

अ) राज्य शासकीय कार्यालयांतील प्रत्येक आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित प्रादेशिक / जिल्हा सांख्यिकी कार्यालयांकडून ऑनलाईन आज्ञावलीकरीता लॉग-इन-आय.डी. व पासवर्ड उपलब्ध करून घ्यावे. सदर माहितीकोषासाठी संबंधित कार्यालयातील कर्मचाऱ्यांची माहिती दिनांक १ जुलै, २०२३ या संदर्भ दिनांकास अनुसरून अद्ययावत करण्यासाठी Employee Master Database २०२२मधील त्यांच्या कार्यालयाने भरलेली माहिती आधारभूत माहिती राहील. माहिती भरण्याचा सूचनासंच ऑनलाईन आज्ञावलीमध्ये उपलब्ध करून दिला जाईल.

आ) राज्य शासनाच्या कार्यालयांची आहरण व संवितरण अधिकारीनिहाय माहिती ऑनलाईन स्वरूपात संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अद्ययावत करण्यासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहे. ज्या कर्मचाऱ्यांच्या माहितीचा समावेश आधारभूत माहितीत असून ते दिनांक १ जुलै, २०२३ या संदर्भ दिनांकास संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत येत आहेत, अशा सर्व कर्मचाऱ्यांची माहिती संगणकीय ऑनलाईन आज्ञावलीमध्ये अद्ययावत करावयाची आहे. याशिवाय, नवीन कर्मचाऱ्यांची (जसे बदली होऊन आलेले अथवा नवीन नेमणूक झालेले, इत्यादी) माहिती आणि आधारभूत माहितीत समाविष्ट नसलेल्या तथापि, दिनांक १ जुलै, २०२३ रोजी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत असलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती देखील या संचालनालयाने दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीमध्ये भरावयाची आहे.

इ) जुलै महिन्यात स्वेच्छानिवृत्ती घेतलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत ते जर दिनांक १ जुलै, २०२३ रोजी राज्य शासनाचे कर्मचारी असतील तर जुलै महिन्यात त्यांच्यावर शासनाचा निधी खर्च पडला असल्याने, अशा कर्मचाऱ्यांचा देखील समावेश माहितीकोषात करावा.

ई) उपलब्ध करून दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीच्या सूचनासंचात तसेच युजर मॅन्युअलमध्ये दिलेल्या सूचनांचे पालन करून योग्य रीतीने कर्मचाऱ्यांची माहिती नोंदणी करावयाची आहे. माहिती नोंदणी करताना कार्यकक्षेत येणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांची माहिती नोंदणी करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावयाची आहे. अशा प्रकारे ऑनलाईन नोंदणी पूर्ण केल्यानंतर माहिती प्राप्त झाल्याचे प्रमाणपत्र जिल्हा सांख्यिकी कार्यालय / प्रादेशिक कार्यालय यांचेकडून संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. माहे नोव्हेंबर, २०२३ च्या वेतन देयकासोबत (November, २०२३ to be paid in December, २०२३) अशा प्रकारचे प्रमाणपत्र जोडले नसल्यास माहे नोव्हेंबर, २०२३ ची वेतन देयके कोषागार कार्यालय / अधिदान व लेखा कार्यालयात स्वीकारली वा पारीत केली जाणार नाहीत. प्रमाणपत्राशिवाय कोषागार कार्यालयांनी वेतन देयक पारित करु नयेत.

उ) शासकीय कार्यालयांनी उपलब्ध करुन दिलेल्या माहितीची तपासणी संबंधित जिल्हा सांख्यिकी कार्यालये करतात व प्रादेशिक कार्यालये यांच्याकडून संनियंत्रण करण्यात येते. संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना सदर माहितीमधील त्रुटी दुरुस्त करण्यासाठी दिनांक १ डिसेंबर, २०२३ ते १५ फेब्रुवारी, २०२४ हा कालावधी देण्यात येत आहे. संबंधित कार्यालयांकडून त्रुटींचे निराकरण झाल्यानंतर लगेच माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र जिल्हा सांख्यिकी कार्यालयाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल. हे दुसरे प्रमाणपत्र माहे फेब्रुवारी, २०२४ च्या वेतन देयकासोबत (February, २०२४ to be paid in March, २०२४) जोडून वेतन देयके कोषागारात सादर करावयाची आहेत. अशा प्रकारे माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र फेब्रुवारी, २०२४ च्या वेतन देयकासोबत जोडले नसल्यास वेतन देयके कोषागारात स्वीकारण्यात येणार नाहीत. प्रमाणपत्राशिवाय कोषागार कार्यालयांनी वेतन देयके पारित करु नयेत.

ऊ) ज्या शासकीय कार्यालयांची वेतन देयके कोषागारात सादर होत नाहीत, अशा सर्व कार्यालयांनीसुध्दा त्यांच्या कर्मचाऱ्यांची व रिक्त पदांची माहिती ऑनलाईन आज्ञावलीद्वारे नोंदणी करून जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांच्याकडे दिनांक ०१ सप्टेंबर, २०२३ ते दिनांक ३० नोव्हेंबर, २०२३ या कालावधीत सादर करावी.

ए) शासन परिपत्रक क्र. समय २०२०/प्र.क्र.३५/१८ (र.व.का) दिनांक ५ जून २०२० अन्वये शासकीय कामकाजासाठी ईमेल व व्हॉट्सॲपचा वापर ग्राह्य धरण्याबाबत सूचना दिल्या आहेत. त्यानुसार जिल्हा

सांख्यिकी कार्यालये/ प्रादेशिक कार्यालये यांच्याकडून ईमेल व व्हॉट्सअॅपवरुन प्राप्त करण्यात आलेल्या प्रमाणपत्राची प्रत ग्राह्य धरण्यात येईल.

३. ऑनलाईन संगणकीय आज्ञावलीमध्ये माहिती भरण्यात काही अडचणी आल्यास संबंधितांनी जिल्हा सांख्यिकी कार्यालये / प्रादेशिक कार्यालये यांच्याशी संपर्क साधून त्याबाबत खुलासा प्राप्त करून घ्यावा. सर्व कार्यालयांनी कार्यवाही विहीत वेळेत पूर्ण होण्याकरिता लॉग-इन आय.डी. व पासवर्ड वेळापत्रकानुसार प्राप्त करून घ्यावेत.

४. सर्व कोषागारे / उप कोषागारे अधिकाऱ्यांनी माहितीकोषाच्या कामी अर्थ व सांख्यिकी संचालनालयास संपूर्ण सहकार्य देऊन माहितीकोषाबाबत जी कार्यवाही अपेक्षित असेल ती पार पाडावी. **माहिती अद्ययावत झाल्याबाबतचे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने दिलेले प्रमाणपत्र माहे नोव्हेंबर, २०२३ च्या वेतन देयकासोबत व माहितीकोषातील माहिती बरोबर असल्याबाबतचे प्रमाणपत्र माहे फेब्रुवारी, २०२४ च्या वेतन देयकासोबत जोडलेले नसल्यास अशा कार्यालयांची देयके अधिदान व लेखा कार्यालयाने / कोषागाराने न स्वीकारता संबंधित कार्यालयांना ती योग्य त्या पूर्ततेसाठी परत पाठवावीत.** मात्र जे राज्य शासकीय कर्मचारी नाहीत अशांच्या वेतन देयकांबाबत ही कार्यवाही लागू नाही. (उदा. मा. राज्यपाल, आमदार, मंत्रिमंडळाचे सर्व सदस्य इ.)

५. कोषागारे / उप कोषागारे अधिकारी यांनी वरील सूचना तातडीने सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-१८८/२०२३/कोषा प्रशा५, दिनांक २७/०७/२०२३ अन्वये नियोजन विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८०८१५२८२३७६१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA PANDURANG WAGH

Digitally signed by RAJENDRA PANDURANG WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ADB1868A49B8719E27D3453044671A8CEDDBD04AF26DD2089ED03E6B1BD92BD, cn=RAJENDRA PANDURANG WAGH
Date: 2023.08.08 15:31:43 +05'30'

**( राजेंद्र वाघ )**
**उपसचिव, नियोजन विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई-३२
२) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) सर्व मंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
५) सर्व मंत्रालयीन विभाग, यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिनस्त सर्व विभाग प्रमुख / सर्व कार्यालय प्रमुख, सर्व संचालनालये यांना या अनुषंगाने कळविण्यात यावे.
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग/कोषा प्र-५, मंत्रालय, मुंबई-३२
७) * सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९) * प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई-३२
१०) प्रबंधक, मूळ / अॅपिलेट शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई -५१

१३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१४) सर्व प्रादेशिक सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय

१५) सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर

१६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई -३२

१७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई -५१

१८) सर्व कोषागार / उप कोषागार अधिकारी

१९) सर्व उप संचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालये (सर्व), अर्थ व सांख्यिकी संचालनालय

२०) निवड नस्ती (का. १४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

* पत्राने